नामनिर्देशनाने नियुक्ती,
प्राध्यापक (प्राणीशास्त्र),
म.शि.से., गट-अ

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः नियुक्ती -२०१८/(१७५/१८)/मशि-१
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १० जानेवारी, २०१९.

वाचा :- महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्रमांकः १५(१)(४)/१८६०/दहा, दि. १९ जुलै, २०१८

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत खालील उमेदवारांची प्राध्यापक (प्राणीशास्त्र), महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट 'अ' (महाविद्यालयीन शाखा) या पदावर त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकान्यात ते ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकृत करतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र | उमेदवाराचे नाव | वर्गवारी | नियुक्तीचा प्रवर्ग | आयोगाने दिलेला गुणवत्ता क्रमांक | पदस्थापनेचा तपशिल |
|---|---|---|---|---|---|
| १ | काळे अर्चना दामोदरराव | OBC | Open | १ | शासकीय विज्ञान संस्था, नागपूर |
| २ | पाटील किशोर गोपाळ | S.C. | S.C. | ४ | शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती |

२. उपरोक्त उमेदवारांची प्राध्यापक, महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ (महाविद्यालयीन शाखा) या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे:-

१) सदर उमेदवारांची वेतनश्रेणी रु. ३७,४००- ६७,००० श्रेणी वेतन १०,००० अशी राहील.
२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.
३) उमेदवारास प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.
४) उमेदवारांचे परिवीक्षा कालावधीतील काम किवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाचे अथवा अननुरुप असमाधानकारक आढळल्यास त्याची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यास अथवा सेवेतून कमी करण्यास पात्र ठरतील.
५) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.७/८/२००१ अन्वये शासनसेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी /वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. उपरोक्त उमेदवारांनी शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि.१९/३/२००३; तसेच यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयांनुसार आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

६) उमेदवारांची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

७) उमेदवारांचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा(वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात येईल.

८) उमेदवारांनी त्यांच्या नावासमोर निर्देशिलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत तात्काळ रुजू व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळविलेल्या गुणवत्ताक्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही. शिवाय प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत काहीही कळविले नाही तर त्यांचे नांव,कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे आदेश रद्द करण्यात येतील.

९) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अंनियो-१००९/ प्र.क्र.३२/ सेवा-४, दि.१८/८/२००९ मधील तरतुदीनुसार दि.१ नोव्हेंबर,२००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तिवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-याने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तिवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि.१ नोव्हेबर,२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि.१ नोव्हेबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग,क्रमांक:अंनियो-१००६/८७/सेवा-४,दि.१२ जानेवारी,२००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबधीत शासकीय कर्मचाऱ्यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन), नियम,१९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि.१८/८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल,अशा शासकीय कर्मचा-यास नवीन परिभाषित अंशदान निवृत्तिवेतन योजना लागू ठरेल.

१०) उमेदवारांचे प्रचलित नियमानुसार सेवानिवृत्तीचे वय शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१५/प्र.क्र.४८४/१५/ विशि-१, दि.१२.०७.२०१६ मधील विहित अटींच्या अधीन राहून ६० राहील.

११) उमेदवारांस नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१२) उमेदवारांनी सेवा सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसूचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

३. हे आदेश प्राप्त होताच संबधीत उमेदवारांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधीत संस्थाप्रमुखांकडे सादर करावा. संस्थाप्रमुखांनी याबाबतचा अहवाल संचालकांमार्फत शासनास सादर करावा.

४. सदर उमेदवारांच्या नियुक्तीबाबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात यथावकाश प्रसिध्द करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११०१५०८२८६६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manisha Pravin Kini

Digitally signed by Manisha Pravin Kini
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=108cbdac08c7e940866a8fc97bfe7f861bf192ce9dd6b4d0924623149a51f9ed, cn=Manisha Pravin Kini
Date: 2019.01.10 15:23:01 +05'30'

( म. प्र.किणी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे

२) सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राव्दारे)

३) संबंधत विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण

४) संचालक, शासकीय विज्ञान संस्था, नागपूर ; संचालक, शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती

वरील उमेदवाराच्या शैक्षणिक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी संस्थाप्रमुखांनी स्वत: करावी व सदर उमेदवारास हजर करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल सहसंचालक व संचालक, उच्च शिक्षण यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-२, नागपूर

६) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/अमरावती

७) श्रीम.काळे अर्चना दामोदरराव, सहयोगी प्राध्यापक, शासकीय विज्ञान संस्था, नागपूर.

८) श्री. पाटील किशोर गोपाळ, सहयोगी प्राध्यापक, शासकीय विज्ञान संस्था, मुंबई

९) निवड नस्ती.